**उर्ध्व गोदावरी खोऱ्यातील IWRM System राबविण्यासाठी उर्ध्व गोदावरी एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापन पथक, औरंगाबाद निर्माण करणेबाबत.**

(INTEGRATED WATER RESOURCES MANAGEMENT SYSTEM)

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आढावा-२०१६/प्र.क्र.१७५/२०१६/आ.(प्रशि)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख : ३० नोव्हेंबर, २०१६

**वाचा**

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/ एडीएम-९, दि. ८/३/१९८४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र:.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
३) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक: आढावा १००२/३३५/२००२/आ(प्रशि), दि.६/२/२००३.

**प्रस्तावना**

महाराष्ट्रातील गोदावरी खोऱ्यातील उर्ध्व भागामध्ये उपलब्ध जलसंपत्तीपेक्षा पाण्याची मागणी जास्त असून, उपखोऱ्यात पाण्याची तूट येत असल्यामुळे अनेक समस्या निर्माण होत आहेत. उर्ध्व गोदावरी खोऱ्यात संगणकीय प्रणालीद्वारे जलसंपत्तीचे विनियमन करता येईल असा अहवाल शासनाद्वारे नियुक्त केलेल्या अभ्यास गटाने सादर केला आहे. त्याप्रमाणे महाराष्ट्र शासन व न्यू साऊथ वेल्स, ऑस्ट्रेलिया यांच्याशी दि.०२/११/२०१२ अन्वये सामंजस्य करार करण्यात आला आहे. उर्ध्व गोदावरी उप खोऱ्यातील जलाशयांचे एकात्मिक प्रवर्तनासाठी ऑस्ट्रेलिया मधील मरे डार्लिंग खोऱ्यातील संगणकीय प्रणालीद्वारे जलसंपत्ती विनियमनाचा केलेला सखोल अभ्यास, एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापनामधील ज्ञान, तंत्रज्ञान व अनुभव इ.चा वापर उर्ध्व गोदावरी खोऱ्यातील समस्या सोडविण्यासाठी उपयुक्त ठरणार आहे. त्यानुसार महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी) यांनी संशोधन व विकास अभ्यास प्रकल्प राबविण्यासाठी सविस्तर प्रकल्प अहवाल शासनास सादर केला आहे. तसेच उर्ध्व गोदावरी उपखोऱ्यामध्ये एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापन करुन, संशोधन व विकास अभ्यास प्रकल्प राबविण्यासाठी रु.५४.५५ कोटी अंदाजित किंमतीच्या सविस्तर प्रकल्प अहवालास शासन निर्णय दि.१९/८/२०१४ अन्वये प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्याने IWRM प्रणाली (Integrated Water Resources Management) राबविण्यासाठी पथक कार्यालय तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

उर्ध्व गोदावरी उपखोऱ्यातील IWRM प्रणाली (Integrated Water Resources Management) राबविण्यासाठी उर्ध्व गोदावरी एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापन पथक हे कार्यालय औरंगाबाद मुख्यालयी कार्यान्वित करण्यास यान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. उर्ध्व गोदावरी एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापन पथक, औरंगाबाद या कार्यालयास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

(अ) प्रकल्पाची अंमलबजावणी गोदावरी खोऱ्यातील एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापनासाठी विकसित करावयाची असल्याने सदर प्रकल्पावर पूर्ण नियंत्रण (देयके अदा करणे, प्रकल्पासाठी आर्थिक तरतूद करणे इ.) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे राहील.

(आ) एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापनासाठी मॉडेलिंग फ्रेमवर्क, क्षमता बांधणी व आंतरराष्ट्रीय दौरे/ प्रशिक्षण यांचे नियोजन कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांनी करावे व त्यासाठी महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन (वाल्मी), औरंगाबाद यांचे मार्गदर्शन घ्यावे.

(इ) IWRM प्रणाली राबविताना अस्तित्वातील ॲक्वास्कॅन यंत्रणेचा अंतर्भाव केल्यावर अतिरिक्त उपकरणांची गरज भासल्यास आवश्यक तांत्रिक मान्यता, निविदा निश्चिती, देयक मंजूरी इ. बाबी तसेच याव्यतिरिक्त काही विशिष्ट कामासाठी आवश्यकतेनुसार सल्लामसलत सेवा उपलब्ध करण्याच्या दृष्टीने इतर सर्व कार्यवाही कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांनी करावी.

(ई) या कामासाठी शासनाकडून उपलब्ध होणारी आर्थिक तरतूद मुख्य अभियंता, नियोजन व जलविज्ञान यांनी कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांना उपलब्ध करुन द्यावी.

(उ) प्रकल्पांतर्गतची एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापनासाठी मॉडलिंग फ्रेमवर्क, रियल टाईम डेटा संकलन पध्दती विकसित करणे इत्यादी कामे पूर्ण करण्यात आल्यानंतर त्याचा वापर महामंडळांतर्गतच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी करावा. तद्नंतर त्याचा अंतर्भाव राज्यातील इतर RTDAS (Real Time Data Acquisition System) यंत्रणेसोबत एकत्रित करुन, एकत्रिकरणानंतर संनियंत्रण आणि देखभाल व दुरुस्तीसाठी मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक यांचेकडे हस्तांतरीत करण्यात यावीत.

(ऊ) IWRM प्रकल्पाचे पथक कार्यालय औरंगाबाद मुख्यालयी कडा भवन येथील शासकीय जागेत कार्यान्वित करावे. त्याकरीता पुरेशी जागा व आस्थापनेचा खर्च इत्यादी अनुषंगिक बाबींची अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद या मंडळ कार्यालयाने पूर्तता करावी.

(ए) पथक कार्यालय प्रमुख हे कार्यकारी अभियंता या दर्जाचे अधिकारी असतील व नियुक्त केलेले अधिकारी किमान २ वर्ष तेथेच कार्यरत राहतील.

(ऐ) प्रपत्र-अ मध्ये नमूद केलेल्या मंजूर पदांमार्फत पथक कार्यालयांतर्गतची कामे करण्यात यावीत.

(ओ) पथक कार्यालयाचे तांत्रिक नियंत्रण मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, औरंगाबाद या प्रादेशिक कार्यालयांतर्गत व प्रशासकीय नियंत्रण अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद कार्यालयाकडे राहील.

(औ) उर्ध्व गोदावरी एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापन पथक, औरंगाबाद कार्यालयांतर्गत खालील कार्यप्रणालीअंतर्गतची कामे कार्यरत राहतील.:-

१) एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापनासाठी मॉडेलिंग फ्रेमवर्क करणे.

२) गोदावरी खोऱ्यात रियल टाईम डेटा संकलन पध्दती विकसित करणे व संकलन पध्दती विकसित करताना अस्तित्वातील ॲक्वास्कॅन उपकरणाचा अंतर्भाव नियोजनामध्ये करावा आणि त्यानुसार अत्यावश्यक यंत्रणा उभारणी करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

३) Hydrological Modelling व RTDAS (Real Time Data Acquisition System), e-Water, New South Wales, Australia मार्फत प्रशिक्षण, अभ्यासदौरे, आंतरराष्ट्रीय दौरे, मॉडेलिंग फ्रेमवर्क यांचे नियोजन व या सर्व बाबींसाठी देयके अदा करणे, प्रकल्पासाठी आर्थिक तरतूद करणे इत्यादी.

४) क्षमता बांधणी व आंतरराष्ट्रीय दौरे तसेच ऑस्ट्रेलियामधील कार्यस्थळी प्रशिक्षणासाठी Modellers ची निवड करणे.

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ईआरडब्ल्यू -१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दिनांक-८/३/१९८४ मधील तरतूदीनुसार, कार्यकारी अभियंता, जायकवाडी पाटबंधारे विभाग क्र.१, पैठण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून यान्वये घोषित करण्यात येत आहे.

४. पथक कार्यालय व योजनेचा खर्च गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद या कार्यालयातील मागणी क्रमांक : "आय-५, ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०४) योजनेतर वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान (०४) (०५) महाराष्ट्र गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१ आय २०४)" या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच प्रकल्पासाठी आर्थिक तरतूद करणे व गरजेनुसार निधी उपलब्ध करुन घेण्याची व सदर निधी गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ औरंगाबाद यांना उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी मुख्य अभियंता, नियोजन व जलविज्ञान प्रकल्प, नाशिक यांची राहील.

५. उर्ध्व गोदावरी एकात्मिक जलसंपत्ती व्यवस्थापन पथक, औरंगाबाद या कार्यालयाच्या निर्मितीसाठी महामंडळ कार्यालयाधिनस्त कार्यरत असलेल्या अधीक्षक अभियंता, जायकवाडी प्रकल्प मंडळ, औरंगाबाद अंतर्गतचा माजलगांव प्रकल्प विभाग, केसापूरी हा विभाग व अंतर्गतच्या ५ उपविभागांपैकी ३ उपविभागांसह (१) माजलगांव प्रकल्प उपविभाग क्र.४, केसापूरी, (२) पैठण उजवा कालवा उपविभाग क्र.४, केसापूरी, (३) जायकवाडी प्रकल्प बांधकाम उपविभाग क्र.४७, केसापूरी बंद करण्यात येत आहे.

६. सदर पथकासाठी तसेच गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद कार्यालयासाठी आवश्यक असलेली मंजूर पदे ही बंद होणाऱ्या विभाग/ उपविभागीय कार्यालयातील मंजूर पदांमधून प्रपत्र-अ मध्ये दर्शविल्यानुसार उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

७. माजलगाव प्रकल्प विभाग, केसापूरी या विभागीय कार्यालयाच्या नियंत्रणाखाली कार्यरत असलेली माजलगाव प्रकल्प उपविभाग क्र.३, केसापूरी व निम्न दुधना प्रकल्प उपविभाग क्र.३, सातोना (मु.औरंगाबाद) ही २ उपविभागीय कार्यालये अस्तित्वातील कार्यभारासह व मंजूर आस्थापनेसह यापुढे कार्यकारी अभियंता, माजलगाव कालवा विभाग क्र.७, गंगाखेड यांच्या नियंत्रणाखाली कार्यरत राहील, त्याचप्रमाणे बंद झालेल्या

विभागीय व उपविभागीय कार्यालयांतर्गतचा शिल्लक कार्यभार व कार्यालयीन सर्व अभिलेख/ दस्तऐवज प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने उचित ठरेल अशा विभाग/ उपविभागांतर्गत संलग्न करण्याची आवश्यक ती सर्व कार्यवाही मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,जलसंपदा विभाग, औरंगाबाद यांनी त्यांचेस्तरावर तात्काळ करावी.

८. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक १०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११३०११४५२४५८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Karbhari Chaudhari
Date: 2016.11.30 11:52:27 +05'30'

**(वि. का. चौधरी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४) मा.मंत्री (खारजमीन) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६) मा.विधानसभा/ विधान परिषद सदस्य (सर्व).
७) प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
११) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळे / सर्व महासंचालक.
१३) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
१४) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
१६) मुख्य अभियंता, नियोजन व जलविज्ञान प्रकल्प, नाशिक.
१७) सर्व मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१८) आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद.

२०) अधीक्षक अभियंता, जायकवाडी पाटबंधारे प्रकल्प मंडळ, औरंगाबाद.
२१) कार्यकारी अभियंता, माजलगांव प्रकल्प विभाग, केसापूरी.
२२) कार्यकारी अभियंता, माजलगांव कालवा विभाग क्र.७, गंगाखेड.
२३) अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
(कार्यालयांच्या बदलाची आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
२४) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५) आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ.

(शासन निर्णय क्रमांक: आढावा-२०१६/प्र.क्र.१७५/२०१६/आ.(प्रशि), दिनांक २९ ऑक्टोबर, २०१६ सोबतचे **प्रपत्र-अ**)

जायकवाडी प्रकल्प मंडळ, औरंगाबाद अंतर्गत बंद होणाऱ्या विभागीय व ३ उपविभागीय कार्यालयांतर्गतच्या मंजूर पदांचा तपशिल व या मंजूर पदांमधून IWRM पथक कार्यालयास तसेच महामंडळांतर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेली मंजूर पदसंख्या.

| अ. क्र. | पदनाम | बंद करावयाच्या कार्यालयांतर्गतची मंजूर पदसंख्या | | IWRM पथक कार्यालयासाठी उपलब्ध करुन दिलेली मंजूर पदे | गोमपाविम, औरंगाबाद कार्यालयासाठी उपलब्ध करुन दिलेली मंजूर पदे | शासन स्तरावरुन प्रकल्प अथवा सिंचन व्यवस्थापनासाठी वर्ग करावयाची उर्वरित मंजूर पदे | एकूण मंजूर पदे (स्तंभ क्र.५ ते क्र.७ प्रमाणे) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | १-विभाग | ३-उपविभाग | विभागीय पथक | | | |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 |
| १ | कार्यकारी अभियंता | १ | ० | १ | ० | ० | १ |
| २ | सहायक अभियंता श्रेणी-१/ उप अभियंता | १ | ३ | ४ | ० | ० | ४ |
| ३ | कनिष्ठ अभियंता/ सहायक अभि. श्रेणी-२/ शाखा अभियंता | ४ | १२ | ४ | ० | १२ | १६ |
| ४ | विभागीय लेखापाल | १ | ० | ० | ० | १ | १ |
| ५ | विभागीय भांडारपाल | १ | ० | १ | ० | ० | १ |
| ६ | आरेखक | १ | ० | १ | ० | ० | १ |
| ७ | सहायक आरेखक | १ | ० | ० | ० | १ | १ |
| ८ | अनुरेखक | ० | ३ | ० | ० | ३ | ३ |
| ९ | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक | ० | १२ | ० | ० | १२ | १२ |
| १० | प्रथम लिपिक | १ | ० | ० | १ | ० | १ |
| ११ | वरिष्ठ लिपिक | ५ | ३ | ० | ६ | २ | ८ |
| १२ | कनिष्ठ लिपिक | ४ | ६ | १ | ६ | ३ | १० |
| १३ | लिपिक टंकलेखक/ टंकलेखक | ३ | ३ | ० | ५ | १ | ६ |
| १४ | लघु टंकलेखक | १ | ० | ० | १ | ० | १ |
| १५ | सहायक भांडारपाल | १ | ० | ० | ० | १ | १ |
| १६ | संगणक | १ | ० | ० | ० | १ | १ |
| १७ | वाहन चालक | १ | ३ | १ | २ | १ | ४ |
| १८ | नाईक | १ | ० | ० | ० | १ | १ |
| १९ | शिपाई | ५ | ६ | २ | ९ | ० | ११ |
| २० | चौकीदार | १ | ३ | ० | १ | ३ | ४ |
| | **एकुण** | ३४ | ५४ | १५ | ३१ | ४२ | ८८ |

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Karbhari Chaudhari
Date: 2016.11.30 11:52:45 +05'30'

वि. का. चौधरी

अवर सचिव, महाराष्ट्र शासन